सार्वजनिक बांधकाम विभागातील सहाय्यक अभियंता श्रेणी-२ व कनिष्ठ अभियंता या पदांना जलसंपदा विभागाच्या सहाय्यक अभियंता श्रेणी-२ व कनिष्ठ अभियंता या पदांच्या विभागीय परिक्षा नियमातील तरतुदी लागू करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः परीक्षा-१०२४/प्रक्र६३/आस्था-२**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२
दिनांक: १३ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-**

१) महाराष्ट्र शासन,राजपत्र असाधारण क्र.११७/२०२४ दि.११/०७/२०२४ अन्वये प्रसिद्ध केलेले जलसंपदा विभागातील सहायक अभियंता, विभागीय परीक्षा (कायम करण्यासाठी) नियम २०२४.

२) महाराष्ट्र शासन,राजपत्र असाधारण क्र.११८/२०२४ दि.११/०७/२०२४ अन्वये प्रसिद्ध केलेले जलसंपदा विभागातील कनिष्ठ अभियंता, विभागीय परीक्षा (कायम करण्यासाठी) नियम २०२४.

**प्रस्तावना -**

जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग या दोन्ही विभागातील सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (राजपत्रित) व कनिष्ठ अभियंता, गट-ब (अराजपत्रित) संवर्गाकरिता घेण्यात येणाऱ्या परीक्षा महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिका, १९८४ परि-१ भाग- ३ मध्ये नमुद व्यावसायिक परीक्षा नियम व कार्यपद्धतीचा अवलंब करुन महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, नाशिक (मेटा, नाशिक) यांच्यामार्फत एकत्रितरित्या आयोजित करण्यात येत होत्या.

२. तथापि, आता जलसंपदा विभागाने संदर्भ क्र. १ व २ येथे नमुद दि. ११.०७.२०२४ रोजीच्या अधिसुचनांन्वये स्वतंत्र विभागीय परीक्षा नियम प्रसिद्ध केल्यामुळे आगामी कालावधीत महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा) नाशिक यांच्याकडून सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांच्या परीक्षा कोणत्या नियमानुसार आयोजित करण्यात येणार याबाबत संदिग्धता निर्माण झालेली आहे.

३. जलसंपदा विभागाच्या उपरोक्त संदर्भाधीन विभागीय परीक्षा नियमांच्या धर्तीवर सार्वजनिक बांधकाम विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ व कनिष्ठ अभियंता या संवर्गाचे विभागीय परीक्षा नियम सुधारित करण्याची कार्यवाही सुरु आहे. तथापि, सदर कार्यवाहीस काही कालावधी लागण्याची शक्यता आहे. सबब सार्वजनिक बांधकाम विभागाचे विभागीय परीक्षा नियम अंतिम होईपर्यंत जलसंपदा विभागाचे संदर्भाधीन क्र. १ व २ येथील विभागीय परीक्षा नियम सार्वजनिक बांधकाम विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ व कनिष्ठ अभियंता या पदास लागू करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**-

सार्वजनिक बांधकाम विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (राजपत्रित) व कनिष्ठ अभियंता (अराजपत्रित) या संवर्गाचे विभागीय परीक्षा नियम अंतिम होईपर्यंत जलसंपदा विभागाचे संदर्भ क्र. १ व २ येथे नमुद दि.११.०७.२०२४ रोजीचे विभागीय परिक्षा नियम सार्वजनिक बांधकाम विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (राजपत्रित) व कनिष्ठ अभियंता (अराजपत्रित) या संवर्गांना लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागातील सहायक अभियंता श्रेणी-२ (राजपत्रित) व कनिष्ठ अभियंता (अराजपत्रित) या संवर्गाचे परीक्षा नियम अंतिम झाल्यानंतर सदर नियम या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८१३१५२०१४७४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

POOJA BHASKAR UDAWANT

Digitally signed by POOJA BHASKAR UDAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=3a216aeb67842b82e08ea38ee54173f5a527cd40299fd7cb135e0abc12d5ab49, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C0BDDEC9E386D4BD1D8C49113A8F429650B2609DEA0BDA6E1ED8FD55A0D6A5FD, cn=POOJA BHASKAR UDAWANT
Date: 2024.08.13 15:35:50 +05'30'

**( पुजा उदावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सर्व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग.
२. सर्व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ/अधिक्षक अभियंता (विद्युत)
३. अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी (मेटा) नाशिक
४. निवडनस्ती आस्था-२